**महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील महिला आर्थिक विकास महामंडळाच्या आस्थापनेवरील नियमित अधिकारी/ कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१९/ प्र.क्र.७७/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २० ऑक्टोबर, २०२१.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेपुर-२०१८/प्र.क्र.४४/सेवा-९, दि.१ जानेवारी, २०१९.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.निवेसु-२०१८/प्र.क्र.१३०/सेवा-४, दि.१ जानवोरी, २०१९.
३) वित्त विभाग, शासन अधिसूचना क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.१/सेवा-९, दि.३० जानेवारी, २०१९.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९, दि.२० फेब्रुवारी, २०१९.
५) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.माविम-२००२/प्र.क्र.१०६/का-१०, दि.५ फेब्रुवारी, २००७.
६) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.माविम-२०१६/प्र.क्र.६७/का-१०, दि.८ जानेवारी, २०१९.
७) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.माविम-२०१६/प्र.क्र.६७/का-१०, दि.४ जानेवारी, २०२१.
८) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.शासाउ २०१९/प्र.क्र.१३/सा.उ., दि.४ ऑगस्ट, २०२१.

**प्रस्तावना -**

सातव्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशीवरील केंद्र शासनाचे निर्णय विचारात घेऊन राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करण्याकरिता श्री.के.पी.बक्षी, सेवानिवृत्त अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ ची स्थापना करण्यात आली होती. सदर समितीच्या शिफारशी शासनाने काही फेरफारासह स्वीकृत करण्याचा निर्णय संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे.

२. राज्यातील सार्वजनिक उपक्रमांमधील कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यासंदर्भात वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.८ येथील दि.४.८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेले निकष जे सार्वजनिक उपक्रम पूर्ण करतील, अशाच उपक्रमातील कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याबाबतचे प्रस्ताव संबंधित प्रशासकीय विभागांनी तपासून, वित्त विभागाच्या सहमतीसाठी सादर करावेत, असा निर्णय घेतला आहे. सदर शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या निकषांची पूर्तता होत असल्याने, महिला आर्थिक विकास महामंडळाच्या आस्थापनेवरील नियमित अधिकारी/ कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शासनाने राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.३०.१.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.१.१.२०१६ पासून मंजूर केली आहे. राज्यातील सार्वजनिक उपक्रमांमधील कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यासंदर्भात वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.८ येथील दि.४.८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतूदी तसेच संदर्भाधीन क्र.३ येथील दि.३०.१.२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील महिला आर्थिक विकास महामंडळाच्या आस्थापनेवरील नियमित अधिकारी/ कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार **दि.१.७.२०२१** पासून सोबतच्या **"परिशिष्ट-अ"** मध्ये नमूद केल्याप्रमाणे सुधारित वेतनश्रेणीत वेतन देण्यास खालील अटींच्या अधीन मान्यता देण्यात येत आहे.

१) महिला आर्थिक विकास महामंडळाने वित्त विभाग/ शासनाकडून सातव्या वेतन आयोगासंदर्भात निर्गमित करण्यात आलेले संदर्भाधीन क्र.३ येथील दि.३०.१.२०१९ व संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२०.२.२०१९ आणि वेळोवेळी निर्गमित करण्यात येणाऱ्या शासन निर्णय/ परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सुधारित वेतनश्रेणीची अंमलबजावणी करावी.

२) सुधारित वेतनश्रेणीचा लाभ देताना शासनामधील समकक्ष पदांना लागू करण्यात आलेल्या वेतनश्रेणीपेक्षा महामंडळातील अधिकारी/ कर्मचारी यांना मिळणारा लाभ जास्त असू नये. सुधारित वेतनश्रेण्या त्या मर्यादेत लागू असाव्यात.

३) महिला व बाल विकास विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील दि.५.२.२००७ रोजीच्या शासन निर्णयानुसार महामंडळाच्या आस्थापनेवर नियमित एकुण ११० पदे मंजूर आहेत. यापैकी ५९ पदे ही रिक्त आहेत. सबब, सद्य:स्थितीत मंजूर असलेल्या संवर्गातील अधिकारी/ कर्मचारी यांनाच सुधारित वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय असेल. नवीन संवर्ग/ पदे निर्माण केल्यास सदर लाभ अनुज्ञेय करतेवेळी शासनाची पूर्वमंजूरी घेणे आवश्यक राहील.

४) प्रस्तावात नमूद केलेल्या पदांमध्ये कोणताही बदल करावयाचा असल्यास अथवा कोणत्याही पदाची श्रेणीवाढ करावयाची झाल्यास तसेच महामंडळातील रिक्त असलेली/ झालेली पदे भरणे/ नवीन पदे निर्माण करणे याबाबतची कार्यवाही प्रथमत: संचालक मंडळाची मान्यता घेऊन तद्नंतर शासनाची मान्यता घेणे बंधनकारक असेल.

५) महामंडळाने यापुढे देखील प्रत्येक वर्षाचे वार्षिक लेखे विहीत वेळेत पूर्ण करुन ते उचित कालमर्यादेत विधानमंडळासमोर सादर करावेत.

६) दि.१.७.२०२१ ते सुधारित वेतनश्रेणीची अंमलबजावणी करेपर्यंतच्या कालावधीतील थकबाकी एकरकमी किंवा टप्प्याटप्प्याने अदा करणे याबाबतचा निर्णय घेण्याचा अधिकार पूर्णपणे महामंडळास राहील. तथापि, यामुळे व सुधारित वेतनश्रेणी लागू केल्यामुळे महामंडळातील आर्थिक भारात मोठ्या प्रमाणात वाढ होणार नाही, याची जबाबदारी प्रशासकीय विभाग व महामंडळ यांची राहील.

७) महामंडळास राज्यातील महिला विकासाचे कार्यक्रम राबविण्यासाठी शिखर संस्था म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. यापुढेही महामंडळाने राज्यातील जास्तीत जास्त महिलांचा विकास यावर भर देऊन महामंडळाची उपयुक्तता व कार्यकुशलता सिध्द करावी.

८) महामंडळाने त्यांच्याकडून राबविण्यात येणाऱ्या योजना/ कामांचा उचित कालबध्द कार्यक्रम तयार करावा. तसेच संदर्भाधीन क्र.६ येथील दि.८.१.२०१९ व संदर्भाधीन क्र.७ येथील दि.४.१.२०२१

रोजीच्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत असलेल्या "नव तेजस्विनी- महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" याबाबतचा आढावा प्रशासकीय विभाग व वित्त विभागास वेळोवेळी सादर करावा.

९) सदर शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेल्या सुधारित वेतन संरचनेमुळे होणारा अतिरिक्त खर्च महिला आर्थिक विकास महामंडळास प्राप्त होणाऱ्या सहायक अनुदानातून भागविण्यात यावा.

१०) सुधारित वेतन संरचनेस नियमाप्रमाणे अनुज्ञेय ठरणारे भत्ते व तद्नुषंगीक लाभ देय राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.शासाउ २०१९/ प्र.क्र.१३/सा.उ., दि.४.८.२०२१ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६५/सा.उ., दि.२१.९.२०२१ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११०२०१२४५३६५२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: CN = VARUDKAR MAHESH ASHOKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2021.10.20 17:45:13 +05'30'

**( महेश वरुडकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (व्यय) / (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
१२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई
१३. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), मुंबई.
१४. महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), नागपूर
१५. उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९. निवड नस्ती, का-१०.

**शासन निर्णय क्र. माविम-२०१९/ प्र.क्र.७७/का-१०, दि.२० ऑक्टोबर, २०२१ चे**

**"परिशिष्ट-अ"**

| अ.क्र. | पदनाम | मंजूर पदसंख्या | सहाव्या वेतन आयोगानुसार विद्यमान वेतन संरचना व असल्यास, विशेष वेतन | | | सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | वेतन बँन्ड क्र. | वेतन बँन्ड | ग्रेड वेतन | |
| १ | व्यवस्थापकीय संचालक | १ | संवर्ग पद | | | संवर्ग पद |
| २ | महाव्यवस्थापक | १ | पीबी-३ | १५६००-३९१०० | ६९०० | S-२४: ७११००-२११९०० |
| ३ | कार्यक्रम व्यवस्थापक | २ | पीबी-३ | १५६००-३९१०० | ६६०० | S-२३:६७७००-२०८७०० |
| ४ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | १ | पीबी-३ | १५६००-३९१०० | ६६०० | S-२३:६७७००-२०८७०० |
| ५ | प्रशासकीय व्यवस्थापक | १ | पीबी-३ | १५६००-३९१०० | ६६०० | S-२३:६७७००-२०८७०० |
| ६ | उपव्यवस्थापक/ वरिष्ठ जिल्हा समन्वय अधिकारी | ८ | पीबी-२ | ९३००-३४८०० | ४४०० | S-१५:४१८००-१३२३०० |
| ७ | उपमुख्य लेखा व वित्त अधिकारी | १ | पीबी-२ | ९३००-३४८०० | ४४०० | S-१५:४१८००-१३२३०० |
| ८ | उपव्यवस्थापक (प्रशासन) | २ | पीबी-२ | ९३००-३४८०० | ४४०० | S-१५:४१८००-१३२३०० |
| ९ | विकास अधिकारी/ जिल्हा समन्वय अधिकारी | १३ | पीबी-२ | ९३००-३४८०० | ४२०० | S-१३:३५४००-११२४०० |
| १० | वरिष्ठ लेखाधिकारी | १ | पीबी-२ | ९३००-३४८०० | ४२०० | S-१३:३५४००-११२४०० |
| ११ | व्यवस्थापकीय संचालकांचे/ अध्यक्षांचे स्वीय सहायक | २ | पीबी-२ | ९३००-३४८०० | ४२०० | S-१३:३५४००-११२४०० |
| १२ | सहायक जिल्हा समन्वय अधिकारी | ११ | पीबी-२ | ५२००-२०२०० | २८०० | S-१०:२९२००-९२३०० |
| १३ | प्रशासकीय सहायक | १ | पीबी-१ | ५२००-२०२०० | २८०० | S-१०:२९२००-९२३०० |
| १४ | सहायक लेखापाल | १ | पीबी-१ | ५२००-२०२०० | २८०० | S-१०:२९२००-९२३०० |
| १५ | लघुटंकलेखक | १ | पीबी-१ | ५२००-२०२०० | २४०० | S-८:२५५००-८११०० |
| १६ | सहायक संनियंत्रण अधिकारी | १४ | पीबी-१ | ५२००-२०२०० | २४०० | S-८:२५५००-८११०० |
| १७ | लिपिक/ टंकलेखक | २४ | पीबी-१ | ५२००-२०२०० | १९०० | S-६: १९९००-६३२०० |
| १८ | वाहन चालक | २ | पीबी-१ | ५२००-२०२०० | १९०० | S-६: १९९००-६३२०० |
| १९ | शिपाई | २३ | १ एस | ४४४०-७४४० | १३०० | S-1: १५०००-४७६०० |
| **एकूण** | | **११०** | | | | |

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: CN = VARUDKAR MAHESH ASHOKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2021.10.20 17:45:38 +05'30'

**( महेश वरुडकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन